2005|015|6|63600|.

**मंत्रालयातील अधिका-यांना मंत्रालय केंद्रीय ग्रंथालयाचे सभासदत्व देण्याबाबत. वर्गणीत खंड पडलेल्या सभासदांबाबत व वार्षिक वर्गणी स्वीकारण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**क्रमांकः- माउस-२००४/प्र.क्र. ८५/२००४/३४,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांकः- १८ ऑक्टोबर, २००४**

वाचाः- १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण-१०९६/ २३५/प्र.क्र.८८/९६/३४, दिनांक ११ जून, १९९६.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.माउस-२००२/ ५४६/३४, दिनांक २७ मे, २००२.

**शासन निर्णय**

मंत्रालय केंद्रीय ग्रंथालयाच्या सभासद अधिका-यांच्या थकीत वर्गणीबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

१) मंत्रालय केंद्रीय ग्रंथालयातील ज्या सभासदांची वर्गणी थकीत असेल त्यांनी ती ४५ दिवसांच्या आत न भरल्यास त्यांचे ग्रंथालयीन सभासदत्व रद्द केले जाईल.

२) अनामत रक्कम भरलेल्या परंतु वर्गणीत खंड पडल्यामुळे, सभासदत्व रद्द झालेल्या सभासदांना पुन्हा ग्रंथालयाचे सभासदत्व चालू ठेवावयाचे असेल तर नव्याने आवेदन पत्र भरावे लागेल व त्यासोबत प्रवेश फी रु.२५/- व वार्षिक वर्गणी रु.२४०/- असे एकूण २६५/- स्वीकारुन त्यांना पुन्हा ग्रंथालयाचे सभासदत्व दिले जाईल.

३). मंत्रालय केंद्रीय ग्रंथालयातील सभासदांना यापुढे दरमहा रु.२०/- प्रमाणे ६ महिन्यांची रु.१२०/- आगाऊ वर्गणी ऐवजी वार्षिक रु.२४०/- आगाऊ वर्गणी ग्रंथालयात भरणा करावी लागेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(प्र.पां.मंत्री)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक (प्रशासन व तांत्रिक कक्ष), माहिती व जनसंपर्क
महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
ग्रंथपाल, मंत्रालय केंद्रीय ग्रंथालय, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती.